**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान फलटण शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०१७/प्र.क्र.१७२(५)/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २६ मे, २०१७

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. नगरो-२०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१६.
४) नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे क्र. नपप्रसं/नगरोत्थान/२०१६/फलटण भुगयो/सं.१२२३३/ का.१३, दिनांक १६ जानेवारी, २०१७ रोजीचे पत्र.
५) दिनांक ३०.०३.२०१७ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाखालील प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६) शासन निर्णय नगर विकास विभाग समक्रमांक दिनांक ३० मार्च, २०१७.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे तांत्रिक मंजुरीचे आदेश पत्र क्र.मु.अ.(पुणे)/तांशा २/फलटण/ भुगयो/७५५, दिनांक ११.०५.२०१७.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत फलटण नगरपरिषदेच्या मलनिस्सारण प्रकल्पास संदर्भाकित दिनांक ३० मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये अंतरिम प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्पात समाविष्ट उपांगांसाठी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी संदर्भाकित क्रमांक (७) येथील दिनांक ११.०५.२०१७ च्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिली आहे. यापूर्वी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून प्राप्त झालेल्या तांत्रिक सहमतीनुसार प्राप्त प्रकल्प किंमतीमध्ये किंवा उपांगामध्ये आता प्राप्त झालेल्या तांत्रिक मान्यतेनुसार **कोणताही बदल झालेला नाही.**

२. त्यामुळे शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३० मार्च, २०१७ अन्वये फलटण नगरपरिषदेच्या रुपये ७२.७० कोटी इतक्या किंमतीच्या मलनिस्सारण प्रकल्पास दिलेली प्रशासकीय मान्यता कायम करण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३० मार्च, २०१७ मधील परिच्छेद क्र.१ व परिच्छेद क्र.३ ते ४ मध्ये विहित इतर सर्व अटी व शर्ती कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०५२६१५०८०८४३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.05.26 17:10:42 +05'30'

**(पां. जो. जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल., मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, पुणे.
११. जिल्हाधिकारी, सातारा.
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सातारा.
१३. मुख्याधिकारी, फलटण नगरपरिषद, फलटण.
१४. निवड नस्ती (नवि-३३)